राज्य शासकीय कर्मचा-यांच्या विभागीय परीक्षा मराठीतून घेण्याबाबत.

...

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-मभावा-१०९०-७७१-२०-ब,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- १९ जानेवारी, १९९१.

संदर्भ:- १. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-ईएक्सएम-१०७६-१७, दिनांक २ ऑगस्ट, १९७६.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-ईएक्सएम-१०८०-१७, दिनांक १७ एप्रिल, १९८०.

निर्णय:- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-ईएक्सएम-१०७६-१७, दिनांक २ ऑगस्ट, १९७६ व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-ईएक्सएम१०८०-१७, दिनांक १७ एप्रिल, १९८० अन्वये शासकीय कर्मचा-यांच्या विभागीय परिक्षांकरिता विहित केलेली पुस्तके शक्य तितक्या लवकर मराठीत भाषांतरित करुन घेऊन व त्यानंतर त्यांचे मुद्रण करुन परीक्षार्थींना उपलब्ध करुन द्यावीत असे आदेश देण्यात आले होते. परंतु त्यानंतर आता बराच कालावधी उलटून गेला तरी ब-याचशा पुस्तकांचे मराठी भाषांतर व मुद्रण अजूनही झालेले नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. परीक्षार्थींना मराठी पुस्तके उपलब्ध करुन देणे व त्यांच्या विभागीय परीक्षा मराठीतून घेणे ही शासनाची जबाबदारी आहे. तरी सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या विभागाशी संबंधित असलेली व विभागीय परीक्षांना विहित केलेली सर्व पुस्तके भाषा संचालनालयाकडून मराठीत भाषांतरित करुन नंतर मुद्रित करुन घेण्याची कार्यवाही तात्काळ पूर्ण करावी असे आदेश देण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

शासनाचे उप सचिव.

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने)

..२/-

प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई [पत्राने],
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई [पत्राने],
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई [पत्राने],
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
वित्त विभाग [इएक्सपी-८],
ग्राम विकास विभाग,
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग,
मंत्रालयीन विभागाखालील इतर सर्व विभागाध्यक्ष व कार्यालय प्रमुख,
निवड फाईल [२ प्रती].

...